**ज्येष्ठ नागरिकांसाठी शरद शतम आरोग्य कवच योजना राज्यात यशस्वीरित्या राबविण्यासाठी प्रस्तुत योजनेकरिता सॉप्टवेअर प्रणाली/ॲप तयार करण्यासाठी सहायक आयुक्त, समाजकल्याण, मुंबई उपनगर यांना समन्वयक म्हणून नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र.: ज्येष्ठना-२०२१/प्र.क्र.१४२/सामासु**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०३ डिसेंबर, २०२१

**प्रस्तावना :**

अनेक ज्येष्ठ नागरिक त्यांच्या आर्थिक मर्यादेमुळे/असहाय्यतेमुळे विशेषत ग्रामीण भागातील ज्येष्ठ नागरिक स्वत:ची शारिरीक तपासणी करीत नाहीत. अशा ज्येष्ठ नागरिकांच्या वेळोवेळी आरोग्य विषयक तपासण्या न करता आल्यामुळे त्यांचे विविध आजार अगदी शेवटच्या टप्प्यात लक्षात येतात. परिणामी उपचार घेण्यास विलंब होतो व आरोग्य समस्या वाढून दुदैवाने मृत्यु होण्याची शक्यता वाढते. त्यामुळे एखादया आजाराचे सुरुवातीस निदान झाल्यास उपचार यशस्वी होण्याचे प्रमाण वाढते. तसेच ज्येष्ठ नागरिकांची नियमित आरोग्य तपासणी करणे या बाबीचा इतर कोणत्याही शासनाच्या प्रचलित योजनांमध्ये समावेश नाही. यास्तव, ज्येष्ठ नागरिकांच्या आरोग्य तपासणीबाबतची **शरद शतम् आरोग्य कवच योजना राज्यात राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.**

ज्येष्ठ नागरिकांसाठी शरद शतम आरोग्य कवच योजना राज्यात यशस्वीरित्या राबविण्याच्या अनुषंगाने मा. मंत्री (सा.न्या.) महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि. ३ नोव्हेंबर,२०२१ रोजी बैठक घेण्यात आली. सदर बैठकीत मा. मंत्री (सा.न्या.) महोदयांनी दिलेल्या निर्देशाप्रमाणे प्रस्तावित योजनेकरिता माझे कुटुंब-माझी जबाबदारी या मोहिमेच्या/योजनेच्या धर्तीवर प्रस्तावित शरद शतम आरोग्य कवच योजनेसाठी सॉप्टवेअर प्रणाली/ॲप तयार करण्याच्या अनुषंगाने सहायक आयुक्त, समाजकल्याण, मुंबई उपनगर यांना समन्वयक म्हणून नेमण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रस्तावित ज्येष्ठ नागरिकांसाठी शरद शतम आरोग्य कवच योजना राज्यात यशस्वीरित्या राबविण्यासाठी प्रस्तुत योजनेकरिता सॉप्टवेअर प्रणाली/ॲप तयार करण्याच्या अनुषंगाने सहायक आयुक्त, समाजकल्याण, मुंबई उपनगर यांना समन्वयक म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०२११२०८१२१२०७७०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA NATHA SAVANE

Digitally signed by RAJENDRA NATHA SAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303, pseudonym=AE89A440549540E82C5C3FE007D468E20DCA5112, serialNumber=F049989DBBEF93340E9EDD88AF960A0963746D42BAA5C948405B62E821529A99, cn=RAJENDRA NATHA SAVANE
Date: 2021.12.08 12:13:02 +05'30'

**( रा. ना. सवने )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा.उप सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई
७. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई
९. मा. मंत्री/राज्यमंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
१२. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
१३. मा.प्रधान सचिव, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानमंडळ, मुंबई
१४. मा. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर
१५. मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर
१६. सर्व विभागीय आयुक्त (महसूल)
१७. आयुक्त, समाजकल्याण, पुणे
१८. जिल्हाधिकारी (सर्व)
१९. सर्व प्रादेशिक उपायुक्त (समाजकल्याण विभाग)
२०. सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण
२१. सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी.